श्री. सुनिल पवार, कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ यांचा दि. १०.०९.२०१८ ते १९.०९.२०१८ या कालावधीतील Mercamadrid, Spain येथील अभ्यास दौरा.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृपमं०४१८ /प्र.क्र.८७ /२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०७ सप्टेंबर २०१८

वाचा :-

१) राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.NCDC:A&C/IC/Spain/१/२०१८ दि. २४.०१.२०१८
२) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ यांचे कृपमं/प्रशासन/एसजीपी/स्पेन दौरा/१२८५/२०१८ दि.१७.०५.२०१८ चे पत्र
३) सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्र. परदौ१४१४/प्रक्र ४६/११ दि.२९.१२.२०१४
४) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ यांचे कृपमं/प्रशासन/स्पेन दौरा/१९८१/२०१८ दि.१६.०८.२०१८ चे पत्र

**प्रस्तावना :-**

स्पेनमधील भारतीय दुतावास यांच्या मार्फत Wholesale Market Set Up या विषयावर अभ्यासदौरा Mercamadrid, Spain येथे दि. १०.०९.२०१८ ते १५.०९.२०१८ या कालावधीत आयोजित करण्यात आला आहे. सदर अभ्यासदौऱ्याकरीता राष्ट्रीय सहकारी विकास निगम कडुन दि. २४.०४.२०१८ रोजी विभागाकडून नामनिर्देशन मागविण्यात आले होते. सदर अभ्यास दौरा Wholesale Market Set Up या विषयावर आधारीत असल्यामुळे राज्यातील फळे, भाजीपाला, शेळी-मेंढी व मासळी यांचे उत्पादन व पायाभूत सुविधा उभारणीकरीता करीत असलेले कामकाज, भविष्यातील उपक्रम, बाजार समितीची विकास कामे, टर्मिनल मार्केट, जे.एन.पी.टी. प्रकल्प व युरोपीयन देशातील फळे व भाजीपाला , प्रक्रिया पदार्थ यांच्या निर्यातीस असलेली संधी इ. बाबींचा उपयोग या अभ्यास दौऱ्यामुळे घाऊक बाजार पेठांना होणार आहे. तसेच दि.१६/०९/२०१८ ते १९/०९/२०१८ या वाढीव कालावधीत स्पेन येथील विविध मार्केटना प्रत्यक्ष भेटी देवून अभ्यास करण्याचे प्रस्तावित आहे. सदर अभ्यास दौऱ्याकरीता शासनामार्फत श्री. सुनिल पवार, कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ यांना Mercamadrid, Spain येथे पाठविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

श्री. सुनिल पवार, कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ यांना दि.१०.०९.२०१८ ते १५.०९.२०१८ या कालावधीत Mercamadrid, Spain येथे Wholesale Market

Set Up विषयावर अभ्यास दौऱ्यास उपस्थित राहण्यास व दि.१६/०९/२०१८ ते १९/०९/२०१८ या वाढीव कालावधीत स्पेन येथील विविध मार्केटना प्रत्यक्ष भेटी देवून अभ्यास करण्याकरीता शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर दौऱ्याचा सर्व खर्च महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे यांच्यामार्फत करण्यात येणार आहे. या व्यतिरिक्त खर्चाचा भार शासनावर येणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या आणि शिफारस समितीच्या तसेच राष्ट्रीय सहकारी विकास निगम यांच्या प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर अभ्यास दौरा पुर्ण झाल्यानंतर संबंधीत अधिकाऱ्यांनी त्यांच्या विदेश दौऱ्यासंबंधीचा विस्तृत अहवाल संबंधीत प्रशासकीय कार्यासनास तसेच सामान्य प्रशासन विभागास सादर करावा. तसेच संबंधीत अधिकाऱ्यांनी अभ्यास दौऱ्यात प्राप्त केलेल्या ज्ञानाचा/कौशल्याचा उपयोग अन्य अधिकारी/कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्यासाठी करावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८०९१११४४१२४१२०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant Baliram Bhoir

Digitally signed by Jayant Baliram Bhoir
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Cooperation, Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=33a892413bd2c105002f2acc67792c5931afb42987d31b0deb6c0181d19c74aa, serialNumber=33432a8e2e81dcab0518d2a6ca4f4f1d3dba7ca3247657527f52bef2a2aa29b2, cn=Jayant Baliram Bhoir
Date: 2018.09.11 14:45:36 +05'30'

**( जयंत भोईर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (पणन),यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई- ३२
३. अ.मु.स.(सेवा), सा.प्र.वि यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. अ.मु.स., वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव ( पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
६. उप सचिव ( पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
७. श्री.सुनिल पवार, कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
८. निवडनस्ती